**कनिष्ठ अभियंता, गट-ब (अराजपत्रित) या पदावर करण्यात आलेली नियुक्ती रद्द करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मुविनि-२०१६/प्र.क्र. ९४/ऊर्जा-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १५ फेब्रुवारी, २०१७.

**वाचा:** १) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१४/प्र.क्र. ५८८/ऊर्जा - ५, दि. २६/०२/२०१५.
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. मुविनि-२०१६/प्र.क्र. ९४/ऊर्जा - ५, दि. ८/७/२०१६.
३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र. मुविनि-२०१६/प्र.क्र. ९४/ऊर्जा - ५, दि. ८/७/२०१६.
४) मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांचे पत्र क्र. मुविनि/मु.लि./१९४०/२०१६-१७, दि. १५.११.२०१६.

**शासन निर्णय:-**

विद्युत निरीक्षणालयाची कामे ऊर्जा विषयक बाबींशी निगडीत असल्याने व विद्युत अधिनियम, २००३ ची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्याकरिता सदर निरीक्षणालय ऊर्जा विभागांतर्गत असणे आवश्यक असल्याने संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये सार्वजनिक बांधकाम विभागाकडील विद्युत निरीक्षणालय शाखा ऊर्जा विभागाच्या अधिपत्याखाली आणण्यात आली आहे.

विद्युत निरीक्षणालय शाखेअंतर्गत कनिष्ठ अभियंता गट-ब (अराजपत्रित) मधील पदे भरण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत सन २०१४ मध्ये तत्कालीन मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांच्यामार्फत जाहिरातीव्दारे परिक्षा घेऊन दि. ११/०५/२०१६ रोजी सार्वजनिक बांधकाम विभागाकडून अंतिम निवडसूची ऊर्जा विभागास प्राप्त झाली. त्यानुसार उपरोक्त संदर्भ क्र. १ व २ अन्वये ४० उमेदवारांची ऊर्जा विभागांतर्गत विद्युत निरीक्षणालय शाखेमध्ये कनिष्ठ अभियंता या पदावर नियुक्ती करण्यात आली. नियुक्ती देण्यात आलेल्या ४० उमेदवारांपैकी ३४ उमेदवार नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले आहेत. उर्वरित ६ उमेदवारांपैकी उपरोक्त संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयामधील तक्त्यातील अ.क्र. (५) श्रीमती. झावेरी राजेंद्र गिरासे यांना त्यांच्या विनंतीनुसार दि. १६/०९/२०१६ पर्यंत नियुक्तीच्या पदावर रुजू होण्यासाठी मुदतवाढ देण्यात आली होती. तसेच त्यांना शासन पत्र दि. ८/०९/२०१६ अन्वये त्यांनी नियुक्तीचे ठिकाण बदलण्याबाबत केलेली विनंती मान्य करता येत नसल्याबाबत व नियुक्तीच्या ठिकाणी विहित मुदतीत हजर न झाल्यास नियुक्ती रद्द करण्याबाबतची कार्यवाही करण्यात येईल असे कळविण्यात आले आहे. तथापि, श्रीमती. गिरासे या मुदतवाढीचा कालावधी संपूनही नियुक्तीच्या ठिकाणी हजर झालेल्या नाहीत. अनुक्रमांक (२० )येथील श्री. शिरीष शिवाजी मैद यांना शासन पत्र दि. ८/०९/२०१६ अन्वये त्यांनी नियुक्तीचे ठिकाण बदलण्याबाबत केलेली विनंती मान्य करता येत नसल्याबाबत व नियुक्तीच्या ठिकाणी विहित मुदतीत हजर न झाल्यास नियुक्ती रद्द करण्याबाबतची कार्यवाही करण्यात येईल असे कळविले आहे. तथापि श्री. मैद हे विहीत कालावधी संपून गेल्यानंतरही नियुक्तीच्या ठिकाणी हजर झालेले नाहीत. तसेच अ.क्र. (२२) श्रीमती स्नेहल लक्ष्मण कुलकर्णी, अ.क्र.(२६) श्रीमती डॉली विवेकानंद शर्मा, अ.क्र(२७) श्रीमती मोहिनी भटुजी बाविस्कर तसेच संदर्भ क्र. ३ च्या शासन शुध्दीपत्रकामधील अ.क्र.(४३) श्री. प्रशांत भाईदास साळुंके हे विहीत कालावधी संपून गेल्यानंतरही नियुक्तीच्या ठिकाणी हजर झालेले नाहीत.

सदर उमेदवारांना सेवेत रुजू होण्यासाठी पुरेशी संधी उपलब्ध करून करून देण्यात आली आहे तसेच त्यांच्या मुदतवाढीच्या अंतिम आदेशान्वये ते नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास त्यांना सदर पदावरील नियुक्तीमध्ये स्वारस्य नाही असे समजून त्यांची नियुक्ती रद्द करण्यात येईल असे कळविण्यात आले होते. तथापि, खालील ६ उमेदवार कनिष्ठ अभियंता, गट-ब (अराजपत्रित) या पदावर अद्यापपर्यंत रुजू झाले नसल्याने त्यांची सदर पदावरील नियुक्ती या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहे.

| अ.क्र. | उमेदवाराचे नाव | शासन निर्णयामधील यादीतील क्र. | नियुक्तीचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | श्रीमती झावेरी राजेंद्र गिरासे | ५ | विद्युत निरीक्षक, भंडारा |
| २ | श्री. शिरिष शिवाजी मैद | २० | विद्युत निरीक्षक, वर्धा |
| ३ | श्रीमती स्नेहल लक्ष्मण कुलकर्णी | २२ | विद्युत निरीक्षक, गोंदिया |
| ४ | श्रीमती डॉली विवेकानंद शर्मा | २६ | विद्युत निरीक्षक, सातारा |
| ५ | श्रीमती मोहिनी भटुजी बाविस्कर | २७ | विद्युत निरीक्षक, ठाणे-२ |
| ६ | श्री. प्रशांत भाईदास साळुंके | ४३ | विद्युत निरीक्षक, मुंबई |

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०२१५१६५०२०७७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhimashankar Yallappa Manta

Digitally signed by Bhimashankar Yallappa Manta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries,Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=873ce9a279d9561ff0cbf658e05b823c67c79dcac309fc4ebdac035d6aeec2a0, cn=Bhimashankar Yallappa Manta
Date: 2017.02.15 16:52:08 +05'30'

(भि.य. मंता)
उप सिचव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री(सा.बां.) यांचे खाजगी सचिव
४. मा. मंत्री(ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
५. मा. राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
६. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद / विधान सभा, विधानभवन, मुंबई
७. सर्व विधानसभा / विधान परिषद सदस्य , महाराष्ट्र राज्य
८. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव (ऊर्जा), मंत्रालय, मुंबई
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा )महाराष्ट्र-१, मुंबई ४०० ०२०
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-२, नागपूर
१२. अधिदान व लेखा अधिकारी, (अराप/रालेवि-१), मुंबई
१३. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
१४. निवासी लेखाधिकारी, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१५. मुख्य विद्युत निरीक्षक,उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, तिसरा मजला प्रशासकीय इमारत, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर (पू) मुंबई-७१
१६. अधिक्षक अभियंता, विद्युत निरीक्षण मंडळ, मुंबई/नागपूर/औरंगाबाद/पुणे
१७. श्रीमती झावेरी राजेंद्र गिरासे
१८. श्री. शिरिष शिवाजी मैद
१९. श्रीमती स्नेहल लक्ष्मण कुलकर्णी
२०. श्रीमती डॉली विवेकानंद शर्मा
२१. श्रीमती मोहिनी भटुजी बाविस्कर
२२. श्री. प्रशांत भाईदास साळुंके

उपरोक्त उमेदवारांना मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांच्याद्वारे

२३. निवड नस्ती- ऊर्जा-५.